**प्रमोद महाजन कौशल्य विकास व उद्योजकता अभियानासंदर्भात विविध प्रकारच्या धोरणासंबंधी निर्णय घेण्यासाठी मा.मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली शक्ती प्रदत्त समिती नेमण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः कौविउ-२०१५/प्र.क्र.**१९५/**रोस्वरो-१**

२ रा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक : ३ ऑगस्ट, २०१५.

**शासन निर्णय** :

दिनांक १२.७.२०१५ रोजी मंत्रिमंडळाने "प्रमोद महाजन कौशल्य व उद्योजकता विकास अभियान" राबविण्याच्या प्रस्तावास मान्यता दिली आहे. या मान्यतेनुसार मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली कौशल्य विकास अभियानासंदर्भात विविध प्रकारच्या धोरणासंबंधी वेळोवेळी निर्णय घेणे यासाठी मा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली एक "शक्ती प्रदत्त समिती" खालीलप्रमाणे नेमण्यात येत आहे :-

| | | |
|---|---|---|
| मा. मुख्य सचिव | - | अध्यक्ष |
| अपर मुख्य सचिव, वित्त विभाग | - | सदस्य |
| अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, | - | सदस्य |
| प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग | - | सदस्य |
| प्रधान सचिव, उद्योग विभाग | - | सदस्य |
| प्रधान सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग | - | सदस्य |
| प्रधान सचिव, शालेय शिक्षण विभाग | - | सदस्य |
| आयुक्त ,कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय | - | सदस्य सचिव |
| संबंधित विभागाचे सचिव | - | निमंत्रित |

**<u>या समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील</u>** :-

१) विविध विभागाकडील कौशल्य विकास योजनाअंतर्गत निधीचे निश्चितीकरण करुन, सदर निधी कौशल्य विकास विभागाकडे वर्ग करण्याबाबत निर्णय घेणे.

२) कौशल्य विकासासंबंधी विविध योजनांची मार्गदर्शक तत्वे, खर्चाचे निकष इ.बाबत निर्णय घेणे.

३) कौशल्य विकासासंबंधी धोरण निश्चित करणे व आवश्यकतेनुसार या धोरणात बदल करणेबाबत निर्णय घेणे.

४) कौशल्य विकासासंबधी प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी विविध विभागांचा सहभाग वाढविणे व त्यांच्याकडील सुविधांचा महत्तम वापर करणेसंबंधी निदेश देणे, तसेच उद्योग समूहांच्या अधिकाधिक सहभागाच्या दृष्टीने निर्णय घेणे.

५) राज्य शासनाच्या संबंधित प्रत्येक विभागाने मंजूर नियतव्ययाच्या काही प्रमाणात निधी प्रमोद महाजन कौशल्य विकास व उद्योजकता अभियानाच्या अंमलबजावणीसाठी या विभागाकडे आवश्यकतेनुसार उपलब्ध करुन देण्याबाबत निर्णय घेणे.

६) जिल्हापातळीवर स्थानिक गरजांनुसार कौशल्य व उद्योजकता विकासाचे विविध उपक्रम राबविण्यासाठी प्रत्येक जिल्हयात जिल्हा नियोजन समितीमार्फत स्वतंत्र निधीची तरतूद करण्याबाबत निर्णय घेणे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८०३१७२९०८३५०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sandesh Chhabu Tadvi

Digitally signed by Sandesh Chhabu Tadvi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sandesh Chhabu Tadvi
Date: 2015.08.03 17:35:42 +05'30'

( **सं.छ.तडवी** )

शासनाचे अवर सचिव

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री व सर्व संबंधित मंत्री, राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव ,मंत्रालय, मुंबई
२. मा.मुख्य सचिव , मंत्रालय , मुंबई
३. सर्व मंत्रालयीन विभागांचे प्रधान सचिव/ सचिव ,मंत्रालय , मुंबई
४. मा.प्रधान सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई

५. सर्व आयुक्त, महानगर पालिका (सहाय्यक संचालक कौशल्य विकास व उद्योजकता संचालनालयामार्फत)

६. सर्व जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय (सहाय्यक संचालक कौशल्य विकास व उद्योजकता संचालनालयामार्फत)

७. सर्व विभागीय आयुक्त/मुख्य कार्यकारी अधिकारी, महानगर पालिका/ नगर परिषद/जिल्हा परिषद (सहाय्यक संचालक कौशल्य विकास व उद्योजकता संचालनालयामार्फत)

८. आयुक्त, कौशल्य विकास व उद्योजकता संचालनालय, कोकण भवन, नवी मुंबई

९. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास संस्था

१०.उपरोक्त समित्यामधील सर्व शासकीय सदस्य

११.संचालक (शिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य ,मुंबई

१२.संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य ,मुंबई

१३.उपसंचालक, कौशल्य विकास व उद्योजकता , प्रादेशिक कार्यालय , मुंबई/पुणे/ नागपूर/अमरावती/औरंगाबाद/ नाशिक

१४.सहसंचालक/ उप संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई/पुणे/ नागपूर/अमरावती/औरंगाबाद/ नाशिक

१५.महालेखापाल ( लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर

१६.कार्यासन अधिकारी, प्रशा-१/ प्रशा-२/ रोस्वरो-२, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग,मंत्रालय, मुंबई

१७.निवड नस्ती / रोस्वरो-१